"पंजाबराव देशमुख वैद्यकीय महाविदयाल येथे करण्यात आलेल्या रुग्ण चाचण्यांचे पलंबित देयके अदा करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०१९/प्र.क्र.३०४/आरोग्य ३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ०४ मार्च, २०२०.

वाचा :

१) **सह संचालक, आरोग्य सेवा रुग्णालय (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांक- ससंआसे/कक्ष-३/टे-१०/सारुअम/सीटीप्रदे/स्वीप्रमं/३२२०-२२/१९ दि.१६.०२.२०१९**

**प्रस्तावना :**

सामान्य रुग्णालय अमरावती, येथील रुग्ण चाचण्या डॉ. पंजाबराव देशमुख वैदयकीय महाविदयालय, अमरावती येथे करण्यात आलेल्या वैद्यकीय चाचण्याचे प्रलंबित देयक स्वीय प्रपंजी खात्यातील शिल्लक रक्कमेमधून अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती या संदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

२. सामान्य रुग्णालय अमरावती, येथील डिसेंबर, २०१३ ते सप्टेंबर, २०१८ या कालावधीत डॉ. पंजाबराव देशमुख वैदयकीय महाविदयालय, अमरावती येथे करण्यात आलेल्या रुग्ण चाचण्याचे प्रलंबित देयके रु.११,१९,१००/- स्वीय प्रपंजी खात्यातील शिल्लक रक्कमेमधून अदा करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

३. वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयातील अटी व शर्तीच काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित अधिकाऱ्याची राहील.

४. शासन निर्णय, क्रमांक-विअप्र-१०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२ दि.१५ एप्रिल, २०१५ चे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ भाग- पहिला, उपविभाग- एक मधील अनुक्रमांक ६,नियम क्र. ४० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार व त्यात नमुद अटीची पुर्तता करण्याच्या अटीच्या अधिन राहून मंजुरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३०४१७००४४४७१७ असा आहे. आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.03.04 18:03:49 +05'30'

**( रो.दि. कदम पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा, तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुगणालय राज्यस्तर), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, अकोला.
६. अधिष्ठता, पंजाबराव देशमुख वैद्यकीय महाविदयालय, अमरावती.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, अमरावती.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. अमरावती.
९. निवडनस्ती (आरोग्य-३).